**शासन पत्रव्यवहारात मंत्रालयाचा संपूर्ण पत्ता लिहिणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक विमस-२०११/प्र.क्र.४५/१८ (र.व का.),
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २१ एप्रिल, २०११.

**परिपत्रक**

विधानपरिषदेत दिनांक २२ डिसेंबर, २०१० रोजी सन्माननीय सदस्यांनी शासन व्यवहारात मंत्रालयाचा पत्ता लिहितांना मंत्रालय हे ज्या मार्गावर आहे, त्या ' मादाम कामा मार्ग' चा आणि ज्या चौकावर आहे, त्या 'हुतात्मा राजगुरु चौक' चा देखिल उल्लेख करुन पूर्ण पत्ता लिहावा अशा स्वरुपाचे प्रतिपादन विशेष उल्लेख अनुषंगाने केले. उपरोक्त आदरणीय व्यक्तींनी देशासाठी केलेल्या त्यागाच्या, कर्तृत्वाच्या आणि संघर्षाच्या स्मृती भावी पिढीस कळाव्यात, हा त्यामागचा उद्देश आहे.

२. उपरोक्त विशेष उल्लेखातील सूचना योग्य असल्याने सर्व मंत्रालयीन विभागांना, त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुखांना निर्देश देण्यात येत आहेत की, यापुढे शासन पत्रव्यवहारात मंत्रालयाचा पत्ता लिहितांना त्यात 'मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक' असा देखिल उल्लेख करुन मंत्रालयाचा संपूर्ण पत्ता लिहिण्यात यावा. (उदा. सामान्य प्रशासन विभाग, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.)

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४२११५३२१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( नंदकुमार जंत्रे)**
**सचिव (प्र.सु. व र. व का.)**

प्रति,

सर्व सन्माननीय संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य,
राज्यपालांचे सचिव (५प्रती)
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५प्रती)

उपमुख्यमंत्र्यांचे सचिव (५प्रती)
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे कार्यालय,
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (५प्रती)
*मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांनी त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागप्रमुख /
कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास वरील बाब आणावी.)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई, (५प्रती)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती.

*पत्राने

C:\Documents and Settings\DELL\My Documents\Note GAD९८.doc